**ॲड. अजय मिसर, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत. ...**

**सायबर पो.स्टे., वि.स्था.गु.र.क्र.०२/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणी मा. महानगर न्यायदंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई व मा. सत्र न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी - ०५२१/प्र.क्र.११७/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २१ ऑक्टोबर, २०२१.

संदर्भ:- १. विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. एसपीपी २०२१/यु.ओ.आर.३१/का-१४, दि. ०६ मे, २०२१.

२. विधि व न्याय विभाग, शासन अधिसूचना क्र. एसपीपी २०२१/यु.ओ.आर.३१/का-१४, दि. २५ मे, २०२१.

**शासन निर्णय:-**

सायबर पो.स्टे., वि.स्था.गु.र.क्र.०२/२०२१ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणी मा. महानगर न्यायदंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई व मा. सत्र न्यायालय, मुंबई या न्यायालयात शासनाच्या वतीने न्यायालयीन कामकाज प्रभावीपणे हाताळण्यासाठी संदर्भ क्र.१ व २ अन्वये नियुक्त विशेष सरकारी अभियोक्ता ॲड. अजय मिसर यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. अतिरिक्त महानगर न्यायदंडाधिकारी, एस्प्लेनेड, मुंबई व मा. सत्र न्यायालय, मुंबई**

| | | |
|---|---|---|
| १) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रुपये ५०,०००/- |
| २) विचारविनिमय फी प्रति तास | - | रुपये १०,०००/- (कमाल मर्यादा ५ तास) |
| ३) प्रवास खर्च व निवास खर्च | - | प्रत्यक्षपणे |

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. अजय मिसर यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य पोलीस मुख्यालय (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२११५१८३७३३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2021.10.21 15:19:26 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. पोलीस सह आयुक्त (गुन्हे), मुंबई.
४. पोलीस उपायुक्त, सायबर विभाग, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई.
५. सहाय्यक पोलीस आयुक्त, सायबर विभाग, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई.
६. वरिष्ठ पोलीस निरीक्षक, सायबर विभाग, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. ॲड.श्री. अजय मिसर, ऑफिस नं.९, तळमजला, राजमहल बिल्डिंग, ॲम्बेसिडर हॉटेलजवळ, वीर नरिमन रोड, चर्चगेट, मुंबई ४०००२०
११. विधी व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-७)
१३. निवड नस्ती (पोल-१०).